# महाराष्ट्र शासन

क्रमांक : गौखनि -३७/०८२०/प्र.क्र.८८/ख-१

महसूल व वन विभाग
हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १२/११/२०२०.

विषय : **गौण खनिज-सांगली**
**मौजे खरातवाडी, ता. वाळवा या वाळूगटाची रक्कम परत मिळणेबाबत.**
**श्री. संतोष भगवान दमामे**

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, सांगली यांना त्यांचे पत्र मह/३/खनिज/आरआर/६९०/२०२०,दि. ०५/०६/२०२०, दि. ०५/०६/२०२० रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रांस अनुलक्षून असे कळविण्यात येते की, दिनांक २२/०२/२०१७ रोजीच्या वाळूलिलावात सन २०१६-१७ या वर्षाकरीता मौजे खरातवाडी, ता. वाळवा या वाळूगटाचा लिलाव श्री. संतोष भगवान दमामे यांना २९९० ब्रास वाळूसाठ्याकरीता रू.७४,२२,०७७/- एवढ्या सर्वोच्च बोलीस मंजूर करण्यात आला होता. त्यानुसार लिलावधारकासोबत करारनामा करुन वाळूगटाचा ताबा लिलावधारकास देण्यात आला आहे.

२. मा. राष्ट्रीय हरीत न्यायाधिकरण, नवी दिल्ली दिनांक १९/०४/२०१७ च्या आदेशान्वये व शासनपत्र दिनांक २१/०४/२०१७ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार वाळू/रेती गटातून सक्शन पंपाद्वारे होणारे उत्खनन बंद करुन वाळू गट पुर्णपणे बंद करण्यात आला. तद्नंतर सदर वाळूगटातील वाळू उत्खनन करण्याकरीता लिलावधारक यांना ताबा व कब्जा परत देण्यात आलेला नाही. त्यामुळे लिलावधारकास उपलब्ध कालावधी व लिलावधारकाने प्रतिदिन करावयाचे उत्खनन यावरुन लिलावधारकास २८३४ ब्रास वाळूचे उत्खनन करता आले नसल्याचे दिसून येत आहे.

३. सबब, लिलावधारक यांना उत्खनन न करता आलेल्या २८३४ ब्रास वाळूसाठ्याकरीता रक्कम रू. ७०,३३,९८८/- (रुपये सत्तर लाख तेहतीस हजार नवशे अठ्याऐंशी रुपये फक्त) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. याबाबीवर होणारा खर्च सन २०२०-२१ यावर्षाकरीता लेखाशिर्ष, “०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६)” खाली उपलब्ध असलेल्या अंदापत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

५. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/ २०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२०१११२१५१११९१४१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revnue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=d7a3efb83c71550e7060464887488d786195babfc16e43c026a74ce9f913a2bc, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2020.11.12 15:13:35 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
अवर सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी सांगली, सांगली.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई- ४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी सांगली, सांगली.
५) वित्त विभाग, (व्यय-९/ अर्थसंकल्प -३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
७) निवडनस्ती “ख” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.